**श्री. कुकडेश्वर आदिवासी हिरडा औद्योगिक उत्पादक सहकारी संस्था मर्या. जुन्नर, जि. पुणे या संस्थेला राष्ट्रीय सहकारी विकास निगम योजनेतंर्गत शासकीय भाग-भांडवलाचा पहिला हप्ता मंजूर करणेबाबत (कोल्हे कमिटी)**

# महाराष्ट्र शासन

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः प्रक्रिया-१११०/प्र.क्र.९८/९-स,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.

तारीख: **२२ ऑगस्ट, २०१४**

**वाचा**

१) शासन निर्णय क्रमांकः प्रक्रिया-११२००४/प.क्र.१६२(अ)/९-स, दि.१२.१०.२००७.
२) पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र दि.२५.७.२०१३
३) मुख्य व्यवस्थापक, राष्ट्रीय कृषी व ग्रामीण विकास बँक(नाबार्ड), मुंबई यांचे दि.१०.९.२०१२ चे पत्र
४) शासन निर्णय समक्रमांक दिनांक ९.४. २०१३
५) शासन निर्णय समक्रमांक दिनांक १५.१.२०१४

**प्रस्तावना**

राज्यातील शेतकऱ्यांनी उत्पादित केलेल्या कृषि मालाला योग्य व रास्त भाव मिळावा तसेच स्थानिक स्तरावर रोजगार निर्मिती व्हावी या उद्देशाने संदर्भ-१ येथील शासन निर्णयातील तरतुदींनुसार राज्यातील कृषि प्रक्रिया सहकारी संस्थांना १:९ या प्रमाणात खालील आकृतीबंधात दर्शविण्यात आल्यानुसार अर्थसहाय्य मंजूर करण्यात येते

(रुपये लाखात)

| **अ. क्र.** | **तपशील** | **टक्केवारी(प्रकल्प किंमतीच्या)** | आर्थिक आकृतीबंध(कमाल रु.५००.००) |
|---|---|---|---|
| १ | राज्य शासनाच्या हमीवर राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली किंवा इतर वित्तीय संस्थेकडून कर्ज. | ६०% | ३००.०० |
| २ | राज्य शासनाचे भाग-भांडवल | ३६% | १८०.०० |
| | एकूण {१+२} :- | ९६% | ४८०.०० |
| ३ | संस्थेचे स्व भाग-भांडवल | ०४% | २०.०० |
| | एकूण :- | १००% | ५००.०० |

२.  हिरडा हे उत्पादन कृषी उत्पन्न बाजार समिती(विकास व नियमन) अधिनियम १९६३ मधील कृषी उत्पन्नाच्या व्याख्येनुसार कृषी उत्पादनातर्गंत Forest Product असल्याची स्पष्ट तरतूद असल्यामुळे श्री. कुकडेश्वर आदिवासी हिरडा औद्योगिक उत्पादक सहकारी संस्था मर्या. जुन्नर, जि. पुणे या संस्थेमार्फत उभारण्यात येत असलेल्या रु.३३६.३५ लाख किंमतीच्या "हिरडा प्रक्रिया" प्रकल्पास समक्रमांकाच्या संदर्भीय क्रमांक ४ येथील दिनांक ९.०४.२०१३ च्या शासन निर्णयान्वये कृषि प्रक्रिया सहकारी संस्थांना ४:३६:६० या प्रमाणात अर्थसहाय्य या योजनेअंतर्गत खालील आकृतीबंधानुसार प्रशासकीय मंजूरी देण्यात आलेली आहे.

(रुपये लाखात)

| अ. क्र. | तपशील | टक्केवारी(प्रकल्प किंमतीच्या) | ४:३६:६० या प्रमाणात शासनाने मंजूर केलेला आर्थिक आकृतीबंध (कमाल रु.३३६.३५) |
|---|---|---|---|
| १ | रा.स.वि.नि. किंवा इतर वित्तीय संस्थांकडून कर्ज | ६०% | २०१.०९ |
| २ | राज्य शासनाचे भाग-भांडवल | ३६% | १२१.०९ |
| | एकूण {१+२} :- | ९६% | ३२२.८९ |
| ३ | संस्थेचे स्व भाग-भांडवल | ०४% | १३.४६ |
| | एकूण {१+२+३} :- | **१००%** | **३३६.३५** |

०३.  संस्थेच्या प्रकल्पास राष्ट्रीय कृषी व ग्रामीण विकास बँक(नाबार्ड), मुंबई यांच्या दिनांक १०.९.२०१२ च्या संदर्भीय पत्रान्वये Umbrella Programme on Natural Resource Management (UPNRM) याखाली सदर संस्थेच्या एकूण रु.४३७.६४ लक्ष किंमतीच्या प्रकल्पास खालील आकृतीबंधात मान्यता दिलेली आहे :-

(रुपये लाखात)

| अ. क्र. | तपशील | राष्ट्रीय कृषी व ग्रामीण विकास बँक(नाबार्ड), मुंबई यांच्या दिनांक १०.९.२०१२ या पत्रान्वये मंजूर केलेला आर्थिक आकृतीबंध(कमाल रु.४३७.६४) |
|---|---|---|
| १ | राष्ट्रीय कृषी व ग्रामीण विकास बँक(नाबार्ड)कडून शासन हमीशिवाय कर्ज. | १८३.३१ |
| २ | राष्ट्रीय कृषी व ग्रामीण विकास बँक(नाबार्ड) कडून शासन हमीशिवाय खेळते भागभांडवल | ५३.२४ |
| ३ | राज्य शासनाचे भाग-भांडवल | १२१.०९ |
| | **एकूण {१+२} :-** | **३५७.६४** |

| अ. क्र. | तपशील | राष्ट्रीय कृषी व ग्रामीण विकास बँक(नाबार्ड), मुंबई यांच्या दिनांक १०.९.२०१२ या पत्रान्वये मंजूर केलेला आर्थिक आकृतीबंध(कमाल रु.४३७.६४) |
|---|---|---|
| ४ | संस्थेचे स्व भाग-भांडवल | ८०.०० |
| | **एकूण { १+२+३ } :-** | **४३७.६४** |

४. श्री. कुकडेश्वर आदिवासी हिरडा औद्योगिक उत्पादक सहकारी संस्था मर्या. जुन्नर, जि. पुणे या संस्थेच्या एकूण रु.४३७.६४ लक्ष किंमतीच्या प्रकल्पास राष्ट्रीय कृषी व ग्रामीण विकास बँक(नाबार्ड), मुंबई यांच्या दिनांक १०.९.२०१२ च्या संदर्भीय पत्रान्वये Umbrella Programme on Natural Resource Management (UPNRM) याखाली मान्यता देण्यात आलेली असून नाबार्डने मंजूर केलेल्या वित्तीय आकृतीबंधानुसार सदर संस्थेस नाबार्डकडून रु.१८३.३० लक्ष इतके कर्ज आणि रु.५३.२४ लक्ष इतके खेळते भाग-भांडवल शासन हमीशिवाय उपलब्ध करून देण्यात येणार आहे. नाबार्डने मान्यता दिलेल्या प्रस्तावानुसार शासकीय भागभांडवलाची रक्कम मूळ रु.३३६.३५ लक्ष किंमतीच्या ३६% म्हणजे रु.१२१.०९ इतकीच आहे. नाबार्डने मान्यता दिलेल्या प्रस्तावानुसार संस्थेने रु.८०.०० लाख इतकी रक्कम बँकेत जमा करणे आवश्यक आहे. त्याप्रमाणे संस्थेने रक्कम भरली आहे.

५. नाबार्डकडून देण्यात येणारे अर्थसहाय्य हे राज्य शासनाच्या भागभांडवलाची रक्कम संस्थेस उपलब्ध करून देण्यात आल्यानंतर तसेच, संस्थेने स्व:भागभांडवलाच्या रु.८०.०० लक्ष इतक्या रक्कमेचा बँकेत भरणा केल्यानंतरच उपलब्ध करून देण्यात येणार आहे. संदर्भीय क्रमांक ४ येथील समक्रमांकाच्या दिनांक ९.४.२०१३ येथील शासन निर्णयातील परि.५(३) नुसार संस्थेने रु.८०.०० लक्ष इतकी स्व:भागभांडवलाची रक्कम बॅकेत जमा केल्यानंतरच संस्थेस शासकीय भाग-भांडवलाची पहिल्या हप्त्याची रक्कम मंजूर करण्यात यावी अशी अट घालण्यात आलेली आहे.

६. वरील अनुषंगाने, सदर अटीच्या अधीन राहून संस्थेने स्व:भागभांडवलाची रक्कम बॅकेत जमा केल्याबाबतच्या पुराव्याची प्रत शासनाकडे सादर केलेली असल्यामुळे परि. २ मध्ये नमूद केलेल्या विहीत वित्तीय आकृतीबंधानुसार श्री. कुकडेश्वर आदिवासी हिरडा औद्योगिक उत्पादक सहकारी संस्था मर्या. जुन्नर, जि. पुणे या संस्थेस अनुज्ञेय असलेल्या शासकीय भाग-भांडवलाच्या रु.१२१.०९ लक्ष रक्कमेपैकी पहिल्या हप्त्याची रु.६०.५० लक्ष इतकी रक्कम संस्थेची आणि संस्थेच्या प्रत्येक संचालकांची मालमत्ता शासनाकडे तारण ठेवल्यानंतर वितरित करण्याच्या अटीवर मंजूर करण्यात आलेली आहे. तथापि, यानंतर सदर अटीची पूर्तता संस्थेच्या संचालक मंडळाच्या सदस्यांना करता न आल्यामुळे संस्थेस दिनांक १५.१.२०१४ च्या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले रु.६०.५० लक्ष इतके अर्थसहाय्य वितरित करण्यात आलेले नसून ते मार्च, २०१४ अखेर व्यपगत होऊन शासनास समर्पित करण्यात आलेले आहे. सबब समक्रमांकाचा दिनांक १५.१.२०१४ चा शासन निर्णय या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात येत आहे.

तद्नंतर संस्थेच्या सदस्यांनी उक्त उट शिथील करण्याबाबत केलेली विनंती, त्यास अनुसरून मा. मुख्यमंत्री महोदय यांनी सदर अट शिथिल करण्याबाबत दिलेले निर्देश आणि सदर अट शिथील करण्यास नियोजन व वित्त विभागाने दिलेली मान्यता यांचे अनुषंगाने समक्रमांकाचा दिनांक १५.१.२०१४ चा शासन निर्णय रद्द करून संबंधित संस्थेस सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात पहिल्या हप्त्याची रु.५८,२२,०००/- इतकी रक्कम (अक्षरी रुपये अठ्ठावन्न लाख बावीस हजार फक्त) मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. तथापि, वित्त विभागाच्या दि.०१.०७.२०१४ च्या परिपत्रकामध्ये ६०% रक्कम खर्चास मान्यता दिली असल्याने उर्वरित महाराष्ट्राच्या हिश्याची रु.३४.९३ लाख मंजूर करण्याची बाब विचाराधीन आहे. याबाबत शासन खालीलप्रमाणे आदेश देत आहे :-

**शासन निर्णय -**

श्री. कुकडेश्वर आदिवासी हिरडा औद्योगिक उत्पादक सहकारी संस्था मर्या. जुन्नर, जि. पुणे या संस्थेला कृषि प्रक्रिया सहकारी संस्थांना अर्थसहाय्य योजनेअंतर्गत मंजूर वित्तीय आकृतीबंधानुसार अनुज्ञेय असलेल्या शासकीय भाग-भांडवलाच्या रु.१२१.०९ लक्ष रक्कमेपैकी पहिल्या हप्त्याची रु.३४,९३,०००/- इतकी रक्कम (अक्षरी रुपये चौतीस लाख त्राण्यव हजार फक्त) वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे. शासकीय भाग-भांडवलाच्या परतफेडीच्या अटी व शर्ती संदर्भीय क्रमांक १ येथील दिनांक १२.१०.२००७ च्या शासन निर्णयातील (प्रत संलग्न) तरतूदींनुसार राहतील.

२. राज्य शासनामार्फत संस्थेस दिल्या जाणाऱ्या भाग-भांडवलाची परतफेड योग्य प्रकारे होण्याचे दृष्टीने संबंधित संस्थेची मालमत्ता व संचालक मंडळाच्या प्रत्येक सदस्याची वैयक्तिक मालमत्ता संस्थेने शासनाकडे तारण ठेवल्यानंतर श्री. कुकडेश्वर आदिवासी हिरडा औद्योगिक उत्पादक सहकारी संस्था मर्या. जुन्नर, जि. पुणे या संस्थेस शासकीय भाग-भांडवलाची रक्कम वितरित करण्याबाबत समक्रमांकाच्या दिनांक १५.१.२०१४ च्या शासन निर्णयान्वये घालण्यात आलेली अट या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात येत आहे.

३. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या रु.३४,९३,०००/- इतकी रक्कम (अक्षरी रुपये चौतीस लाख त्राण्यव हजार फक्त) या रकमेचे आहरण करुन श्री. कुकडेश्वर आदिवासी हिरडा औद्योगिक उत्पादक सहकारी संस्था मर्या. जुन्नर, जि. पुणे या संस्थेला वितरित करण्याकरिता लेखाधिकारी, पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यालय, पुणे यांना "आहरण व संवितरण अधिकारी" व पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेली रक्कम जिल्हा कोषागार अधिकारी कार्यालय, पुणे येथून आहरित करुन संस्थेस वितरीत करण्याची कार्यवाही आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रण अधिकारी यांनी करावी. त्यास अनुसरुन उक्त परि. २ मधील अटीची पूर्तता झाल्यानंतरच रु.३४,९३,०००/- इतकी रक्कम (अक्षरी रुपये चौतीस लाख त्राण्यव हजार फक्त) चा धनादेश

**श्री.कुकडेश्वर आदिवासी हिरडा औद्योगिक उत्पादक सहकारी संस्था मर्यादित जुन्नर ता. जुन्नर, जि. पुणे "SHRI KUKADESHWAR ADHIVASI HIRDA AUDHYOGIK SAHAKARI SANSTHA MARY., JUNNER TAL. JUNNER, DIST. PUNE. " या नांवाने काढण्यात यावा व सदर धनादेश संस्थेस वितरित करण्यात यावा.**

४. याव्यतिरिक्त श्री. कुकडेश्वर आदिवासी हिरडा औद्योगिक उत्पादक सहकारी संस्था मर्या. जुन्नर, जि. पुणे या संस्थेस शासकीय भाग-भांडवलाच्या परतफेडीसाठी नेहमीच्या अटी व शर्ती (त्यात काही सुधारणा /बदल असल्यास त्यासह) बंधनकारक राहतील. त्याचप्रमाणे दिनांक ९.४.२०१३ च्या शासन निर्णयातील सर्व अटींचे पालन करणे संस्थेवर बंधनकारक राहील.

५. वरीलप्रमाणे मंजूर केलेला शासकीय भाग-भांडवलाचा रु.३४,९३,०००/- इतकी रक्कम (अक्षरी रुपये चौतीस लाख त्राण्यव हजार फक्त) चा खर्च "मागणी क्र.व्ही-३, ४४२५-सहकारावरील भांडवली खर्च, (००) (१०८) इतर सहकारी संस्थांमधील गुंतवणूका (०२) सहकारी संस्करण संस्था - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना (०२) (०८) कृषि प्रक्रिया संस्थांना भाग भांडवली अंशदान (कोल्हे समिती) (राज्य योजना) (४४२५ ०७५९) ३२, अंशदाने" या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. सदरच्या रकमेचा विनियोग संस्था आवश्यक त्या संबंधित बाबींकरिताच करीत आहे, याबाबतचे नियंत्रण पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी ठेवावे व याबाबतचा अहवाल शासनास वेळोवेळी सादर करण्यात यावा. त्याचप्रमाणे पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, पुणे यांनी संस्थेच्या कामकाजावर आणि प्रकल्प उभारणीवर लक्ष ठेवावयाचे आहे. संस्थेच्या कामाच्या प्रगतीचा तिमाही अहवाल जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, पुणे यांनी पणन संचालक, पुणे यांना सादर करावा. पणन संचालक यांनी सदर अहवाल तपासून परस्पर राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली व क्षेत्रीय कार्यालय, पुणे यांना न चुकता दर तीन महिन्यानंतर सादर करावा. जेणेकरुन निगमाकडून शासनास रक्कमेची प्रतिपूर्ती लवकरात लवकर होऊ शकेल. संस्थेकडून योग्य वेळी व योग्य प्रमाणात वसूली होण्याबाबत यथायोग्य दक्षता घेणे, पणन संचालक यांचेवर बंधनकारक राहील. या कामी कुचराई झाल्यास एकरक्कमी अर्थसहाय्याची रक्कम वसूल करण्याचे अधिकार शासनाकडे राहतील. संस्थेचा प्रकल्प विहित मुदतीत पूर्ण करण्याबाबत संस्थेने योग्य ती काळजी घ्यावी.

७. या प्रकल्प खर्चामध्ये वाढ झाल्यास सदर वाढीव किंमत संस्थेने स्वबळावर उभी करावयाची आहे. वाढीव प्रकल्प किंमतीमध्ये शासनाचा कोणताही अर्थसहाय्याचा सहभाग असणार नाही, याची संस्थेने नोंद घ्यावी.

८. महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका , नियम १४८ व १५३ अन्वये शासनाने दिलेली कर्जे व त्यावरील व्याजाची वेळचेवेळी वसुली नियमितपणे केली जात आहे व त्या सरकारी लेख्यात यथोचितरित्या जमा केल्या जात आहेत यावर संनियंत्रण ठेवण्याची जबाबदारी विभागीय नियंत्रक अधिका-याची आहे. तसेच दिलेल्या कर्जासंबंधीचे अभिलेख संकलित करणे, लेखे अद्ययावत ठेवणे आणि त्या संदर्भातील इतर आवश्यक कार्यवाही करणे ही जबाबदारी देखील संबंधित नियंत्रक अधिका-याची आहे. या संदर्भातील सूचना वित्त विभागामार्फत यापूर्वीच देण्यात आल्या आहेत.

९. हे आदेश नियोजन तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३६३/१४/व्यय-२, दिनांक ७.८.२०१४ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२२१३२९५८१७०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sawant Balasaheb I

Digitally signed by Sawant Balasaheb I
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=CMTD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sawant Balasaheb I
Date: 2014.09.22 13:26:06 +05'30'

**( बा. ई. सावंत )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत-

१. राज्यपाल महोदय यांचे प्रधान सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव सचिव
३. मा.मंत्री ( सर्व ) यांचे खाजगी सचिव
४. मा.राज्यमंत्री ( सर्व ) यांचे खाजगी सचिव
५. सर्व मा.विधीमंडळ सदस्य,
६. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
७. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
८. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर
९. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
१०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१२.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१३.व्यवस्थापकीय संचालक, राष्ट्रीय सहकारी विकास निगम, ४, सिरी इन्स्टीटयूशनल एरिया, हौज खास, नवी दिल्ली- ११० ०१६.
१४.प्रादेशिक संचालक, राष्ट्रीय सहकारी विकास निगम, ५, बी.जे. रोड, पुणे-१
१५.सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
१६.पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे
१७.कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (का.१४३१) मंत्रालय, मुंबई
१८. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-२)/(अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई
१९.जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, पुणे
२०.लेखाधिकारी, पणन संचालनालय, म. रा. पुणे-१
२१.कार्यासन अधिकारी (१७-स), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२२.अवर सचिव (२१-स), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
**२३.** अध्यक्ष, **श्री. कुकडेश्वर आदिवासी हिरडा औद्योगिक उत्पादक सहकारी संस्था मर्या. जुन्नर, जि. पुणे**
२४. निवड नस्ती (९स).